# मास्तर



शिक्षकदिन विशेषांक...शाळा !!!

संपादक - सुप्रिया (जोशी) जाधव , पुणे .
रेणुका (रेपाळ) खटावकर , पुणे .
सुधीर मुळीक , मुंबई.

शिक्षकदिन २०१०

चिंचा-बोरं...पेरु-कैरी...

दंगा –धुडग़ूस तिन्ही त्रिकाळी...
आईचे धपाटे ...बाबांची शिस्त...
आज्जी- आजोबांच्या मायेवरचं भिस्त !!!
शिरा-पूरी... डब्बा करु फ़स्त...
येताय का तुम्हीही ??? धम्माल करु या मस्त !!!

चला...चला... तर लवकर ...उशीर झालाय आधीचं......

झंम्प्या अन चंम्प्या शाळेत उशीरा येतात...

शिक्षक – काय रे चंम्प्या , उशीर का झाला तुला ?

चंम्प्या – गुरुजी , काल रात्री स्वप्नात मी अमेरीकेला गेलेलो ...तिथुन यायला उशिर झाला...
शिक्षक - आणि झंप्या तुला का रे उशिर झाला ?
झंम्प्या - सर, मी चंम्प्याला आणायला एअरपोर्टवर गेलेलो...

हे...हे...हे...

शिक्षकदिनाच्या हार्दिक शुभेच्छा !!!

शाळेचे दिवस नि शाळा न आठवणारा महाभाग...
शोधुनही सापडणार  नाही या त्रिलोकात.....
‘देस तसा भेस’...नि... ‘गांव तशी शाळा..’
....आज पुन्हा एकदा सैरसपाटा करुन येऊयात शाळेचा...

अरेच्चा !!! घाबरताय काय असे शाळेच्या नावाने ???
शाळेत असताना केलेली ‘शाळा’ आठवतेय ...होय ना?
गृहपाठ, परिक्षा...असली कसलीही भानगड नाहीय भिडू !!!
उलट मधे-मधे चटकदार विनोदांची मेजवानीही आहे हं.....
‘आखिर ब्रेक तो बनता ही है !!!’

**माझी शाळा...**
(सत्य घटनेवर आधारीत)

मारुतीच्या देवळात
भरायची माझी शाळा
शेंदरी मुर्ती शेजारीचं
फ़ळा लावला काळा

सकाळीच वाजायची
घण घणा घण घंटा
शाळेची कि देवळाची
यावर नेहमीच तंटा

शाळा भरता लागायची
भली भक्तांची रांग
निवांत पुजा मारुतीची
चालायची सांगोपांग

गुरुजींना मोठी होती
मारुतीरायाची भक्ती
सकाळीच दर्शनाची
सगळयांनाच सक्ती

सावरलेल्या भुईवर
गोणपाटाचे आस्तर
पहिली ते चौथी
एकच होते मास्तर

मास्तरांचा स्वभाव होता
भलताच कडक
आहो पोरांचे सोडा
बापांनाही भरायची धडक

पोरे कीत्येक इथुन
शिकुन गेली घरी
मारुती ताटकळतोय
द्रोणगीरी घेऊन करी .

**-हरीश दांगट.**



काय मग आठवली न तुमचीही शाळा तुम्हाला... अं ???

‘पिंपळाचे झाड ...त्याची साऊली...
बालपणीची याद केवळ राहीली...’

माझा आवडता विषय होता गणित...हो...हो...पुढे आयुष्याचं चुकलं...तरीही...आणि तुमचा ?

खरतर...प्रत्येक विषयाचे... असते वेगळेच वैशिष्ठ्य ...
काही एकदम सोप्पे...सोप्पे...काही अवघड...भलतेचं शिष्ठ !!!

एकदा गणिताचे शिक्षक वर्गात शिकवत असतात.
बंडु तू सांग...
मी तुला १० गोळ्या दिल्या ...
त्यातल्या ३ तू रोहीणीला दिल्यास...
३ विजयला दिल्यास ...
आणि ४ स्मिताला दिल्यास तर तुला काय मिळेल ?

बंडू- सर मला ३ मैत्रिणी मिळतील.

वाह !!! काय पण ऊत्तर ...

गणितात लागलेले 'दिवे' पाहिले...पाहुयात तरी इतर विषयांमधलीही (अधो) गती... विषयानुरुप........

**मराठी...**
४० वर्षांपूर्वी काय
अन आत्ता काय ...
हा भाषेचा विषय नसून
प्रांताचा आहे ...
तो आपल्याच पोरांनी शिकण्याचा नसून ...
फ़क्त राजकारणाचा आहे...

**इंग्रजी...**
कुत्र्याला म्हणायचे टॉम ,
अन आईला म्हणायचे मॉम...
बापाला म्हणायचे डॅड ,
येत नाही त्याला मॅड...
आपण आपले दुध वाघीणीचे पीत राहू...
पिढ्यान पिढ्या गुलामीचे गीत गाऊ.

**इतिहास...**
राजांनी , बापूंनी , बाबासाहेबांनी घडवला...
आम्हीही एक दिवस नक्की घडवू...
त्या दिवसाची वाट बघत
इतिहासजमा होऊ

**हिंदी...**
हि आपली राष्ट्रभाषा...
मराठी हीची लहान बहीण आहे...
आता लहान आहे की महान हा वाद...
अन शाळेत शिकवतात ,
भाषेने साधता येतो म्हणे संवाद.

**गणित...**
चार होत नाहीत
दोन आणि दोन...
कधी पाच तर कधी तीन...
आणि आयुष्यातल्या गणितात
आम्ही नेहमीचं दीन...

**शास्त्र...**
प्रत्येक क्रियेला...
तेव्हडीचं जोरात प्रतिक्रिया मिळते
पिंग केले तिला...
कि ती लगेचं ऑफ़ - लाईन होते...
अन आपल्याला शास्त्र नव्याने उमगते

**संस्कृत...**
आपल्याला अवघड जात असले तरी
कॉंम्पुटरला समजावण्यासाठी
सोप्प आहे म्हणे...
आपले पूर्वज होते महान
हे नव्याने आहे सांगणे...

**भूगोल...**
एवढं सांगण्यासाठी...
रेषा आखल्या
कि कुठून कुठपर्यंत त्यांच आहे
अन ईथपासून ईथपर्यंत आपल आहे
हे सगळयांनाच माहित आहे कि गोल आहे
पण तिच्या एक असण्याला मोल आहे.

**-विनायक उजळंबे.**

**रसायनशास्त्र...**

पाणीपूरी...
म्हंटलं की मला पित्त होतं
आणि पाणीपूरीला नाही म्हंटल कि...
तिचं पित्त खवळत
कदाचित म्हणूनचं आजकाल
तिची नि माझी 'केमेस्ट्री' जुळतचं नाही.

-निरज आडे.

**भौतिकशास्त्र...**

भौतिकशास्त्रातील बहुतेक सुत्रं
मला कळायचीचं नाहीत...
भौतिकाची भुतं मानगुटीवर अशी बसायची
कि मान दुसरीकडे वळायचीचं नाही
या विषयाचे मात्र मला नेहमीचं कवतिक
असायचे
म्हणुन तर या पेपरला माझे डमीचं बसायचे.

-राज जाधव.

**जीवशास्त्र...**

नियम आहे , तेचं टिकतात
जे वातावरणातील बदलाप्रमाणे
आपले अवयव नि अंग बदलतात...
ईथे आम्ही रोज पहातोय...
तेच जिंकतात
जे बदलत्या प्रवाहाप्रमाणे...
रुप नि रंग बदलतात.

एकूणचं विषयांचे काय
एक संपला कि नवा येतो
विषयानुरुप आपली जागा घेतो जनात
अन आपण उगाचचं विषयातला आशय
धरुन बसतो मनात...

-विनायक उजळंबे.

अबब !!! इतके सारे विषय....ह्यांचा अभ्यास करायचा तरी केव्हा नि कसा?

शिक्षक – राजू तू रात्री कीती वाजेपर्यंत अभ्यास करतो ?
राजू - सर! रात्री १२ वाजेपर्यंत...
शिक्षक – तरी पण नापास होतोस...नक्की काय चक्कर आहे ?
.
.
बरं अभ्यासाला कीती वाजता बसतोस ???
राजू - सर ! अकरा वाजून पन्नास मिनीटांनी ...

ओह..नो...!!! नक्कीचं नाही हं असा...राजूसारखा...

मग कुणाला बरं विचारावं ...जाऊदे तुम्हीचं सांगा बुवा...
सांगा कस शिकायचं ?
रडत - खडत की प्रेमात पडतं , अं?
तुम्हीचं ठरवा !

## विडंबन - सांगा कस शिकायचं ?

कविवर्य मंगेश पाडगावकरांची माफ़ी मागून...

सांगा कस शिकायचं ?
रडत - खडत की प्रेमात पडतं
तुम्हीही चिडवा !

पाढे म्हणून आमची वाट
कोणीतरी लावतचं ना?
भूण-भूण दोन तास
आमच्यापुढे करतचं ना ?
लाथा खात बसायचं की चणे खात हसायचं
तुम्हीही गिरवा !

काळयाकुट्ट परिक्षेत
जेव्हा काही सुचत नसतं
तुमच्यासाठी कोणीही
कॉपी घेवून उभ नसतं
काळोखात पडायचं की प्रकाशात सडायचं
तुम्हीही बडवा !

शाळेत ‘दाते’ टपून बसतात
हे अगदी खरं असतं
अन ‘फुलं’ फुलून येतात
हे काय खरं नसतं ?
दात्यांवर चिडायचं की फ़ुलांकडे बघायचं
तुम्हीही बिघडा !

वर्ष अर्ध सरलं आहे
असं सुध्दा म्हणता येतं
वर्ष अर्ध उरलं आहे
असं सुध्दा म्हणता येतं
सरलं आहे म्हणायचं की ‘भरलं’ आहे म्हणायचं
तुम्हीही तुडवा !

सांगा कस शिकायचं ?
रडत - खडत की प्रेमात पडतं
तुम्हीही ठरवा !

**-रेणुका (रेपाळ ) खटावकर .**

दुसरीतला मुलगा शाळेतून घरी आल्यावर वडीलांना म्हणतो.

मुलगा - मी उदया शाळेत  जाणार नाही.....
वडील – का रे , काय झाले ?
मुलगा - आज आमच्या शाळेत आमचे वजन केले ...
वडील -  मग त्याचा शाळेत न जाण्याशी काय संबध ?
मुलगा – काय माहीत उदया आम्हाला विकूनही टाकतील .

वाह , काय पण अक्कल !!!

तुम्ही-आम्ही एकवेळ सगळं काही विसरुत हो.... ऑफ़िस...बॉस...काम...कामाच्या कटकटी...
घर-दार...हो हो...अगदी नवरा/बायको सुध्दा...
पण...पण...ते पहिल-वहिलं प्रेम...ते विसरु शकाल सहजासहजी ?

## पहिलं प्रेम...

पहिलं प्रेम – चौथीमधलं
पुन्हा एकदा करायचयं
पुन्हा एकदा माझ्यावर
तिला हसताना पहायचयं
काही गोष्टी चुकून सुटतात
आणि काही सुटून चुकतात
चुकलेलं, सुटलेलं बरचं काही
पुन्हा एकदा जमवायचयं
काही करुन आयुष्यात
एकदा पुन्हा लहान व्हायचयं.

तिची हुशारी अभ्यासातील
माझी होती खोडयांमधली
तिला मिळती शाबासक्या
मला नेहमी ऊठ्या-बश्या
पहिला नंबर दोघांचाही
तिचा वरुन , माझा खालुन
-एकदा तरी बदलायचयं
काही करुन आयुष्यात
एकदा पुन्हा लहान व्हायचयं.

मागल्या बाकावरची माझी
जागा होती ठरलेली
तिरका कोन साधुन गुपचुप
नजर तिला भिडलेली
सर मला नेमके तेव्हाच
प्रश्न काही करायचे
-आणि नंतर झोडायचे
एकदातरी मला त्यांना
ऊत्तर चोख दयायचयं
काही करुन आयुष्यात
एकदा पुन्हा लहान व्हायचयं.

अजून पाचवीतला पहिला दिवस
मनात तसाचं आहे
नवे शहर , नवी शाळा
सारं नविन आहे
एकदाही तिच्याशी
बोललोचं नाही
आज सुध्दा त्याची
बोच मनात आहे
गांव माझे सोडण्याआधी
एकदा तिला भेटायचय
काही करुन आयुष्यात
एकदा पुन्हा लहान व्हायचयं.

**-(रसप) रणजित पराडकर.**

एका माणसाला ११ मुलं असतात...

पहिल्या दहा जणांची नावं...

दहा...
वीस...
तीस...
चाळीस...
पन्नास...
साठ...
सत्तर...
ऐंशी...
नव्वद...
शंभर...
अशी असतात तर ११ व्या मुलाचे नांव काय असेल ???

ऊत्तर – " रेड्डी का ?".

अशी ही क्रिकेटची टीम तयार करणा-या 'ऑल राऊंडर' बाबांचे प्रताप तरी पाहुयात...ते शाळा कॉलेजात असतानाचे...

## ऑल राऊंडर !!!

आमचे बाबा शाळा-कॉलेजात
क्रिकेट खेळायचे खुपच छानं
गोष्टी त्यांच्या ऐकताना तर
आम्ही जातो विसरुन भान

एकदा म्हणे त्यांचा चेंडू
जोरात इतका ऊंच गेला
वरती ऊडणारा एक कावळा
तो चेंडू लागून तिथेचं मेला

एका षटकात सहा सिक्सर
कितीदा तरी त्यांनी मारले
आपल्या संघाला हरता-हरता
बहुतेक वेळा त्यांनीचं तारले

फ़िल्डींगमधे यांच्या जो-तो
श्वास रोखुन बघत रहायचा
कारण यांच्याकडे येणारा
प्रत्येक चेंडू झेल व्हायचा

गोलंदाज म्हणून बाबा तेव्हा
पाच-सहा तरी विकेट घ्यायचे
सामन्यानंतर सगळीकडे
यांचेचं तेव्हडे कौतुक व्हायचे

बाबांच्या या गोष्टी ऐकायला
उत्सुक असतो आमचा ताफ़ा
जरी आम्ही हे जाणून असतो
आहेत सगळया या निव्वळ थापा.

-----------

कल्पनाविलासात रममाणं होणं...फ़ायदयाचं की तोटयाचं हो...अं ???

डोळे मिटून कल्पना कर की तू एका बंद खोलीत बसला आहेस...प्रशिक्षक सांताला सांगू लागले , तिला खिडकी दरवाजा काही नाही ...अचानक त्या खोलीला आग लागते...
आता तू काय करशील ???

सोप्पय !!!
सांता हसून म्हणाला...कल्पना करणं थांबवीन .

खडखडून भुकेजल्यावर चविष्ठ पदार्थांच्या कल्पनेनेही जसे तोंडाला पाणी सुटते... अगदी तस्सेचं कॉलेज लाईफ़ आठवले की  मन पाखरु भरकटायला लागते ...

## कॉलेज लाईफ़...

कँटीन मधला चहा आणि
चहा सोबत वडा-पावं
पैसे कुठले खिशात तेव्हा
ऊधारीचचं खातं राव !

कट्ट्यावर बसणं लेक्चर चुकवून
आणि पोरींची चेष्टा करणं
दिसलीच एखादी चांगली तर
तिला लांबुनचं बघुन झुरणं !

बसलोचं चुकून लेक्चरला तर
शेवटचा बाक ठरलेला
कुणाच्या तरी वहीतल पानं
आणि पेनसुध्दा चोरलेला !

परीक्षा जवळ आली की
मात्र रात्री जागायच्या
डोळयात स्वप्न उदयाची
म्हणून झोपाही शहाण्यासारख्या वागायच्या !

पूर्ण व्हायचं एक वर्तुळ
एक वर्ष सरायचं
पुन्हा नव्या पाखरांसोबत
जुनं झाड भरायचं !

अशी वर्तुळं भरता-भरता कळलं
अरे कागदचं भरला
वर्तुळ झाल्या कागदाला
फ़क्त सलाम करायचा उरला !

पुन्हा नविन रस्ता
पुन्हा नविन साथी
जुन्या रस्त्याच्या प्रवासाच्या
फ़क्त आठवणीचं बाकी !!!

-राजीव.

हम्न!!!
गेले ते दिन गेले ...

सांता एकदा आर्ट गॅलरीमधे जातो ...

सांता – ह्या भयानक दिसणा-या वस्तूला तुम्ही ‘आधुनिक कला’ म्हणता काय ?

विक्रेता - माफ़ करा महाशय पण तो आरसा आहे.

आणि आरसा कधीही खोटे बोलत नाही...
त्यामुळे ‘ती’ त्याला होकार देईल की नकार ???
हा गहन प्रश्न त्याला न सतावेल तरचं नवलं !!!

## मदार ‘ती ’च्या होकारावर होती !!!

मी वर्गात सर्वात शेवटी , ती पहिल्या बाकावर होती ,
म्हणाल तर अंतर बरचं , म्हणाल तर हाकेवर होती !

कधी कधी मला पहायची , हसायचीही अधुन-मधून ,
पण घराण्याची अब्रु म्हणे तिच्या नाकावर होती !

मसाले दुध केशराचं! तशी न्यारीच काहीशी वेगळी ,
पण तहान भागवायची वेळ आमची ताकावर होती !

आमच्या खिशात सुट्टे , कधी नोटाही असायच्या ,
पण तिची भुक म्हणे , हजार नि लाखांवर होती !

रोज पाठलाग करत , तिच्या घरापर्यंत पोहोचायचो ,
पण एक बांधलेली कुत्री , तिच्या दारावर होती !

चंद्र मी आणला होताचं , सर्व तारेही तोडलेले ,
सारं तिचचं होतं फ़क्त , मदार ‘ती ’च्या होकारावर होती !

**-सनिल पांगे.**

जाऊदे झालं...नकार मिळो वा होकार ...शेवटी एकच दुःखद
अंत असतो सगळयाचा...लग्न !!!

संता रोज कॉलेजात आपल्या कुत्र्याला घेवून जात असे...
त्याला वर्गातही नेत असे...

......काही दिवसांनी संता एकटाचं कॉलेजात जाताना दिसू लागला...

का ???

कारण कुत्रा ग्रॅज्युएट झाला !!!

कुत्रा तर झाला ग्रॅज्युएट , आता ईतर प्राण्यांचे काय ?
निदान ते साक्षर होतात की रहातात तसेचं अंगठा बहाद्दर...
पाहुयात तर खरे ...



मास्तर

## साक्षरता अभियान !!!

साक्षरता अभियान जंगलात आले
सर्व प्राण्यांना गोळा त्यांनी केले ,
बोला तुमच्यात कोण निरक्षर आहे ?
उंट म्हणाला मीच तेवढा साक्षर आहे !
प्रश्न होता फ़ार मोठा ,
निरक्षरांना तर नव्हताच तोटा .
प्राण्यांना वाचता आल पाहिजे,
जंगल साक्षर झाल पाहिजे,
राजानं लगेचं काढल फ़र्मान ,
गोळा करा म्हणे शाळेचं सामान .
जंगलात आता शाळा झाली सुरु ,
प्राणीही हातात पाटी लागले धरु.
उंटाचाही शिकल्याने फ़ायदा झाला ,
अधिका-यांनी त्याला तर मास्तरचं केला .
शिकवत असतो दशक सुटे ,
सिंहाच्या हातावरही मारतो रट्टे .

सिंह राजालाही नव्हते आसन वेगळे ,
म्हशींच्या शेजारी बसले होते बगळे .
लबाड कोल्हा मधेचं पळे ,
उंटाला तेही लवकर कळे .
कुणाच्या हातात कुणाची नाडी ,
उंदराने धरली सिंहाची दाढी .
सावली पाहून घेतली गाढवाने लोळी ,
माकड मधेचं शेपटी चघळी .
काही दिवसातचं गळती झाली सुरु ,
एक नाहीतर दोनच प्राणी लागले उरु.
मास्तरांना आता प्रश्न पडला मोठा ,
साक्षरतेचा खेळ ठरला होता खोटा.
मास्तर म्हणाले सोडवावा कसा गुंता ?
अधिकारी बोलले करु नका चिंता .
दुस-याचं दिवशी लेटर जिल्ह्याला गेले ,
म्हणे जंगल सारे साक्षर झाले ....
साक्षरता अभियान यशस्वी झाले !!!

**-रमेश ठोंबरे.**

ओम फ़स्स्स्स !

शेवटी  सगळं मुसळ केरात !!!

सांता - हे सग़ळे लोक का पळताहेत ?

माणुस- ही शर्यत आहे...जो जिंकेल त्याला कप मिळेल.

सांता - फ़क्त जिंकणा-याला कप मिळणार आहे तर बाकीचे
	का पळताहेत ?

मान्य आहे की सध्याचे युग हे प्रगतीचे आहे...प्रगती म्हंटली की स्पर्धा अटळचं हो... पण त्या स्पर्धेलाही काही मर्यादा ???

ह्या जीवघेण्या वाढत्या स्पर्धेचे जे दुष:परिणाम भोगावे लागतात पुढच्या पिढीला ते मात्र फ़ारच महागात पडते...

'भिक नको पण कुत्र आवर'.... अशीचं पाळी येते जणू...

कारण ' जान है तो जहान है !!!'

हो की नाई ???

## देशाने स्पर्धेत तरुणाई विकली....

कसल्या शाळा भरवता...
विद्यार्थी राहीलेत कुठे आता...
अपेक्षांच्या ओझ्यासकट
मुलांना जन्म देते माता
अशीचं जर का
कोवळी फुले ऊमलण्याआधी सुकली
खरचं देशाने स्पर्धेत तरुणाई विकली....

केव्हाचं विकली विद्या
स्पर्धाचं उरली सध्या
जगणं शिकवण विसरले शिक्षक
विद्यार्थी दप्तरासाठीचाचं पेंद्या
अशीचं जर का
पानं वाढण्याआधीचं पिकली
खरचं देशाने स्पर्धेत तरुणाई विकली....

गुजरले खेळाचे दिन
विरले रम्य बालपण
पुस्तके स्वप्नात दिसतात
परिक्षेत उरतो फ़क्त ‘पण’
अशीचं जर का
पोरं शाळेत फ़क्त पुस्तकचं शिकली
खरचं देशाने स्पर्धेत तरुणाई विकली....

के. जी. पासून पदवीपर्यंत
जो तो बुध्दीचा पाहतो अंत
जिवघेण्या स्पर्धेत मुलगा
आधीपासूनचं मरतो...पण संथ-संथ
अशीचं जर का
ज्ञानार्जनाऐवजी विद्या दबावाखाली झुकली
खरचं देशाने स्पर्धेत तरुणाई विकली....

शाळेपाठी हवी सगळयांनाच नोकरी
बंगल्यात गाडी नि गोरी छोकरी
मिळवणारे आनंदात जगतात
बाकीच्यांचा जीव घेते बेकारी
अशीचं जर का
आई-बापाच्या स्वप्नपुर्तीत पोरं
थकली
खरचं देशाने स्पर्धेत तरुणाई
विकली....

कुठे थोडं गणित चुकलं कि
पायरीचं चुकते भविष्याची
समजून कोण घेतो आम्हा
शेवटी होळी करतो आयुष्याची
अशीचं जर का
गळफ़ासाची दोरी तुम्हीचं हाती दिली
मग नक्कीचं सारं जग म्हणेल
या देशाने स्पर्धेत तरुणाई विकली....

**-रामदास राऊत**

शिकवणं ही एक कला आहे...पण त्यापुढेजावून पेपर तपासणं
ही शिक्षकांसाठी एक सत्वपरीक्षाचं ठरते...

काही काही उत्तर पत्रिका म्हणजे ईतक्या भन्नाट असतात...
कधी कधी नुसते प्रश्नचं उतरवलेले असतात...जसेच्यातसे !
कधी अक्षर ईतके खराब की लागता लागता पुरेवाट...
आणि एक एक ऊत्तरं इतकी मजेशीर की ...हसावं की रडावं
उमगतचं नाही...

“सर तुम्ही मला शून्य मार्क दिलेत या पेपरात , हे मला बिलकूल मान्य नाहीय .” ढ़ब्बू ढगोळे तणतणत म्हणाला.

“अरे ढब्बू , तुलाचं काय ? मलाही मान्य नाहीत हे मार्क...”
खंडेराव खत्रुड सर म्हणाले .

“पण शुन्यापेक्षा कमी मार्क देताचं येत नाहीत ना रे !!!”

मी जरी एक माजी शिक्षिका असले तरीही अजूनी आठवतात मला ते दिवस...

## मला आठवतात ते दिवसं !!!

उत्सुक बोलक्या डोळयांचे
लबाड खट्याळ खोड्यांचे
अजब-गजब प्रश्नोत्तरांचे
हसत-खेळत शिकवण्याचे

मला आठवतात ते दिवसं !!!

प्रार्थनेवेळच्या चुळबुळींचे
मधल्या सुट्टीतल्या गोंगाटाचे
ग्राउंडवरच्या धुमाकुळीचे
निरपेक्ष प्रेमाच्या देवाण-घेवाणीचे

मला आठवतात ते दिवसं !!!

मानं-पाठ एक करुन...
रात्रीचाही दिवस करुन ...
डोळयामधे तेल घालून ,
पेपर तपासत बसण्याचे...

मला आठवतात ते दिवसं !!!

पोळी-भाजी कशीतरी आटोपून
रात्री नुसतचं कुकर चढवुन
आवडत्या मालिकांची आहुती देऊन
कशाकशात लक्ष नसण्याचे

मला आठवतात ते दिवसं !!!

अक्षर लावताना ऊडणा-या तारांबळीचे
भोपळा मिळवलेल्या उत्तरपत्रिकेंचे
अन मार्क नेमके कापावेत कुठे ?
अनेकदा पडलेल्या या गहन प्रश्नांचेही

मला आठवतात ते दिवसं !!!

-सुप्रिया (जोशी) जाधव.

काही काही मुले भारी व्रात्य असतात...तर काही काही शिक्षक इतके आदर्श ...की आपल्या जिवनावर कायमचा ठसा उमटवून जातात...
पण  तरीही ...प्रत्येक गोष्टीला अपवाद असतात हेचं खरे !
व्यक्ती तितक्या वल्ली...

**गुरुमहीमा !!!**

आमचे गुरु तंबाखु चिमुटभर खायचे ,
पिचकारी मात्र हातभर मारायचे !

विश्रांतीचे महत्व खूप जाणून असायचे ,
दुपारी दोन तास ताणून दयायचे !

घरुन भांडून आलेत हे पोरानांही कळायचे ,
त्या दिवशी रट्टे मात्र जास्तचं मिळायचे !

हाताची नेहमीचं काळजी घ्यायचे ,
पोरांना प्रसाद मात्र छडीचाच दयायचे !

सणासुदीला सिगरेटही ओढायचे ,
पोरासोरांना मग जरा जास्तचं झोडायचे !

गुरुजींनी एवढी काही दहशत निर्माण केली ,
निम्मी-अधिक पोरं शाळा सोडून गेली !

लोक म्हणतात गुरुने आम्हाला तारले ,
आम्ही म्हणतो गुरुने आम्हाला मारले !

**-हरीश दांगट.**

गुरुजी  स्पेशल !!!

एकदा दोन गुरुजी  गप्पा मारत बसलेले असतातं...

पहिले - मला टाटा किंवा बिर्लांची मालमत्ता मिळाली तर...
मी  त्यांच्यापेक्षा जास्त पैसा कमावेन !!!

दुसरे –कशाला उगीचं फुशारक्या मारता,कसं शक्य आहे ते?

पहिले – का नाही ? सकाळ-संध्याकाळ दोन शिकवण्यासुध्दा
घेईन ना !!!

फ़क्त विद्यार्थांचीचं गोची होते असे नाही तर शिक्षकांसाठीही
हा एक लढाचं असतो...

**लढा गुरुजी लढा !!!**

झिजले जरी नाक तरी
पाया त्यांच्याचं पडा
आदर्शांच्या पुरस्कारासाठी
लढा गुरुजी लढा ...

अशी ‘शाळा’ जमली की
पुढचे सगळे सोडा
निवडणुका जवळ आल्यात
लढा गुरुजी लढा ...

बघा रेस सुरु झाली
नाचवा कागदी घोडा
नकदी रक्कम हाती घेवून
लढा गुरुजी लढा ...

लढतो तो जिंकतोच
फ़क्त स्वाभिमान थोडा सोडा !
अब्राहम लिंकनचे काय ऐकता ?
लढा गुरुजी लढा !!!

**-सुर्यकांत डोळसे.**

गुरुः ब्रम्हा गुरुः विष्णु
गुरुः देवो महेश्वरा
गुरुः साक्षात परब्रम्हः
तस्मै श्री गुरवे नमः !!!

खरे तर गुरुंचे आपल्या प्रत्येकाच्या जिवनातले स्थान आणि  महत्व शब्दातीतचं !!!

"क्षितीजावरच्या स्वप्नांचा जिथून उंबरठा होतो सुरु ,
तळहातावरील रेषांपेक्षा नक्कीचं मोठा असतो गुरू !!!"

आणि म्हणूनच...

## त्रिवार वंदन तुला गुरु !!!

जेव्हा ,
मन भरकटते ,
विचारांच्या सागरातं
गुरु, दीपस्तंभ बनतोस तू...
तेव्हा ,
तरबेज खलाशी बनते मी...

जेव्हा ,
अनोळखी होते ,
आरशातल्या छबीत ,
गुरु , ओळख पटवतोस तू...
तेव्हा ,
होते लक्षवेधी चेहरा मी...

जेव्हा ,
एकटी पडते ,
स्वतःच्याचं गावात ,
गुरु , पाठींबा असतोस तू...
तेव्हा ,
करते बलाढ्य नेतृत्व मी...

जेव्हा ,
धाडस कोसळते ,
भयाच्या कोठडीत ,
गुरु , प्रेरणा देतोस तू...
तेव्हा ,
घेते उत्तुंग भरारी मी...

जेव्हा ,
निराशा पसरते ,
अपयशाच्या अंधारात ,
गुरु , प्रकाश होतोस तू...
तेव्हा ,
बघते नवी दुनिया मी...

आता ,
नभावरही नांव माझे लिहीन ,
गुरु , लेखणी माझी आहेस तू...

त्रिवार वंदन तुला गुरु !!! त्रिवार वंदन तुला
गुरु !!!

-

- **स्वप्ना कोल्हे.**

“जेथे दिव्यत्वाची प्रचिती तेथे कर माझे जुळती...”

जाता...जाता...पुन्हा हसुन घेऊयात का थोडस्स ???

मी शाळेत जातो तेव्हा...

अजूनी डोळयासमोरुन जसेच्यातसे तरळुन जातात ते दिवस.फ़क्त खाणे,खेळणे,नि निरधास्तपणे झोपेच्या आधिन होणे...आणि हो खाल्लेल्या गोष्टींची विल्हेवाट लावणे हया सा-या विधी व्यतरिक्त काही दुसरं जगात करण्यासारख असतं यावर माझा तेव्हातरी काडीचा विश्वास बसला नसता...अशा या आयुष्यातील सुखद काळाला साक्षात कर्दनकाळ ठरवण्याचा विडाचं या शाळेने उचलला होता जणू ! हो आणि ही जबाबदारी वटबरहुकुम पार पाडायला आमचे कर्तव्यदक्ष मास्तर तत्परचं होते अगदी.

पहिल्या दिवशी मला शाळेत सोडवायला दोन रिक्षा लागल्या होत्या...एकात...मी,आई,आजोबा...दुस-यात माझ्या आत्या नि आज्जी ! असा सारा लवाजमा जणू माझा शेवटचा निरोप घ्यायला आल्यासारखा माझ्याकडे बघत होता.शिशु वर्गाच्या गेटाला गज लावण्याची भन्नाट क्लुप्ती ज्या कोणाच्या

तल्लख मेंदुतून निपजली असेल त्या महाभागास नोबेल पारितोषिक नाहीतर नाही पण कमीतकमी शाळेची बेलतरी बहाल करायला हवीचं होती असे मला आज प्रकर्षाने वाटते...

गजाआडचा कैदी आणि आम्ही ...चेह-यावरची एकचं मुद्रा...

आता किमान १५ वर्षं सुटका नाही !!!
कैदीतरी कमीतकमी १४ वर्षांनी सुटतात बिचारे...असो!

शाळेत सर्वात जास्त घाबरवणारा प्रकार म्हणजे ...नाही

हो छडी नाही...कडक बाई पण नाहीत...तो म्हणजे तुमचा शेजारी...कारण हा प्राणी आजन्म तुम्हाला चिकटणारं हे मात्र अगदी पक्के! त्याच्या सवयी...त्याचं बोलणं... वागणं... ई. ई.

बरं त्या काळात सौंदर्य दृष्टीही नसते...सारचं राम-भरोसे !

निदान तो हुषार आहे की नाही हे ही गुलदस्त्यातचं असतं सुरवाती सुरवातीला.

जादुगार जशी एक-एक जादु त्याच्या पोतडीतून काढतो

तशीचं शाळाही आपला एक-एक रंग दाखवू लागते हळु-हळु...

भाषा , गणित , इतिहास , भूगोल , नागरीकशास्त्र, पर्यावरण...मग वाढत्या वयासोबत ते प्रकार अजुन भयंकर होवू लागतात...गणिताला फ़ाटे फ़ुटतात...विज्ञानाच्या विभागण्या होतात...आणि तुमच्या १६ तासांची(झोपायचे ८ वगळल्यास) वर्गवारी होते.

अशी ही शाळा नुसतीच असती...अभ्यास...परिक्षांशिवाय तर कोण धम्माल आली असती  नं? पण तरीही  शाळेविषयी का एक अनामिक ओढ लागुन रहाते प्रत्येकालाचं काय माहित...तसा आजही मी कच्चाचं राहीलोय म्हणा कोडी सोडवण्यात !!!

**-मकरंद सावंत.**

***ई-साहित्य प्रतिष्ठान*** esahity@gmail.com